**जवाहरलाल नेहरु बंदरास (JNPT) इंदौर पर्यंत रेल्वेमार्ग जोडणी करण्यासाठी मनमाड ते इंदौर नवीन रेल्वे मार्ग प्रकल्प राबविणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**गृह (परिवहन व बंदरे) विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः आरएलवाय ०५१८/प्रक्र ११२/परि ५**

मंत्रालय, मादाम कामा मार्ग , हुतात्मा राजगुरु चौक

मुंबई ४०००३२

दिनांक : १३ ऑगस्ट, २०१८

वाचा -

१) भारतीय बंदरे रेल्वे महामंडळ लि. यांचे पत्र क्रमांक IPRCL /Mumbai /Projects / MMR-IND/१४/१ दिनांक ३०.०४.२०१८

२) केंद्र शासनाच्या जहांज मंत्रालयाचे सचिव यांचे अ.शा. पत्र क्रमांक IPRCL-२५०/११/२०१७-IPRCL दिनांक २८.०६.२०१८

प्रस्तावना -

देशातील बंदरांना रेल्वेमार्ग जोडणे (Port Railway Connectivity) यास केंद्र शासनाने प्राधान्य दिलेले आहे. त्यामुळे रस्त्यावरील अवजड वाहनांची वर्दळ कमी होऊन आर्थिक बचती बरोबरच रस्ते अपघाताचे प्रमाण कमी होणे, प्रदुषण कमी होणे असे फायदे मिळत असतात. राज्यातील जवाहरलाल नेहरु बंदरामध्ये (JNPT) येणारा माल जलद गतीने मध्य भारत आणि उत्तर भारत भागात पोहचविणे आवश्यक आहे. त्यामुळे इंदौर मनमाड या नविन होणाऱ्या रेल्वे मार्गास जवाहरलाल नेहरु बंदराची जोडणी करणे आवश्यक आहे. केंद्र शासनाने सागरमाला प्रकल्प सुरु करण्यास केंद्रिय मंत्रीमंडळाच्या दि. २५/०३/२०१५ च्या बैठकीत मान्यता दिली असून त्याव्दारे बंदराच्या आधुनिकीकरण आणि नविन बंद उभारणे, मालाची तत्परतेने वाहतुक करणे, बंदराशी संबंधित आधुनिकीकरण इ. धोरणे निश्चित करण्यात आली आहेत. बंदराशी संबंधित विकास करण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या जहांज मंत्रालयाने (Ministry of Shipping) आणि रेल्वे विकास निगम लि. यांच्या संयुक्त भागीदारीतून "**भारतीय बंदरे रेल्वे महामंडळ लि. (Indian Port Rail Corporation Ltd.)**" नावाची कंपनी स्थापन करण्यात आलेली आहे. जवाहरलाल नेहरु बंदरे विश्वस्त (JNPT) यांनी दिलेल्या सुचनेनुसार **भारतीय**

**बंदरे रेल्वे महामंडळ लि. (Indian Port Rail Corporation Ltd.)** या कंपनीने इंदौर ते मनमाड असा ३६२ कि.मी. लांबीचा रेल्वे मार्ग उभा करण्याचा प्रस्ताव तयार करुन केंद्र शासनाच्या रेल्वे मंत्रालयास सादर केला होता. केंद्र शासनाच्या रेल्वे मंत्रालयाने दि. २२/०२/२०१८ च्या पत्रान्वये प्रकल्पास मान्यता देऊन सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी भागीदार शोधणे आणि प्रकल्पाशी संबंधित विशेष उपयोजिता वाहन (SPV) स्थापन करण्याचे निदेश भारतीय बंदरे रेल्वे महामंडळ लि. (Indian Port Rail Corporation Ltd.) यांना दिलेले होते. सदर प्रकल्प **विशेष उपयोजिता वाहनाव्दारे (SPV)** राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-**

१. जवाहरलाल नेहरु बंदरे ते इंदौर अशी रेल्वे जोडणी करण्यासाठी मनमाड ते इंदौर या ३६२ कि.मी. नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाने या प्रकल्पाच्या सविस्तर प्रकल्प अहवालास (DPR) मान्यता देण्याच्या अधिन राहून राज्य शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. मनमाड ते इंदौर असा ३६२ कि.मी. लांबीचा नवीन रेल्वे मार्ग प्रकल्प खालीलप्रमाणे विशेष उपयोजिता वाहन (SPV) स्थापन करुन त्याव्दारे राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विशेष उपयोजिता वाहनातील भागीदार | समभाग प्रमाण |
|---|---|---|
| १ | जवाहरलाल नेहरु बंदरे विश्वस्त (JNPT) | ५५% |
| २ | महाराष्ट्र शासन किंवा त्यांनी नियुक्त केलेले सार्वजनिक उपक्रम | १५% |
| ३ | मध्यप्रदेश शासन किंवा त्यांनी नियुक्त केलेले सार्वजनिक उपक्रम | १५% |
| ४ | सागरमाला डेव्हलपमेंट कॉर्पोरेशन लि. (SDCL) आणि इतर | १५% |
| | **एकूण** | **१००%** |

३. मनमाड ते इंदौर या ३६२ कि.मी. लांबीच्या नवीन रेल्वे मार्ग प्रकल्पाची वैशिष्टे खालीलप्रमाणे आहेत.

मनमाड ते इंदौर रेल्वे मार्गाची वैशिष्टयै

| | |
|---|---|
| रेल्वे मार्गाची लांबी | ३६२ कि.मी. |
| महाराष्ट्र राज्यातील रेल्वे मार्गाची लांबी | १८६ कि.मी. |
| मध्यप्रदेश राज्यातील रेल्वे मार्गाची लांबी | १७६ कि.मी. |
| रेल्वे मार्ग प्रकार | विद्युत मार्ग ब्रॉडगेज |
| रेल्वे मार्गाची गती | १२० कि.मी. प्रति लक्ष |
| रेल्वे मार्गावरील स्थानके | एकूण १३ |
| लागणारी जमीन | २००८ हेक्टर<br>(महाराष्ट्र ९६४ हेक्टर) |
| **प्रकल्पाची एकूण किंमत** | **रु. ८५७४.७९ कोटी** |

४. या प्रकल्पासाठी राज्य शासनाचा हिस्सा रुपये ५१४.९६ कोटी (१५% हिस्सा याप्रमाणे) देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. राज्य शासनाचा रु. ५१४.९६ कोटी हिस्स्यापैकी खोदकामाची रॉयल्टीची रक्कम रु. १४०.८६ कोटी आणि शासकीय जमिनीचे मुल्य रु. १५.२५ कोटी अशी रक्कम विशेष उपयोजिता वाहनामध्ये परस्पर वळती करुन ती रक्कम राज्य शासनाचा हिस्सा म्हणून वर्ग करण्यास मान्यता देण्यात येत आहे. राज्य शासनाच्या हिस्स्याची उर्वरित रक्कम रु. ३५८.८५ कोटी पुढील पाच वर्षात अर्थसंकल्पीय योजना खर्च तरतूदीमधून उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर रेल्वे प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी लागणाऱ्या जमीनीचे अधिग्रहणाची किंमत (Land Acquisition) विशेष उपयोजिता वाहन (SPV) मार्फत केली जाईल. सदर किंमत रेल्वे मंत्रालयाद्वारे सवलत कालावधी संपल्यानंतर विशेष उपयोजिता वाहन (SPV) द्वारे अदा केली जाईल. विशेष उपयोजिता वाहनामार्फत (SPV) जमिनीचे अधिग्रहण करताना लागणारी किंमत महाराष्ट्र शासन यांनी निश्चित केलेल्या धोरणाप्रमाणे अदा करण्यास विशेष उपयोजिता वाहन (SPV) जबाबदार राहील.

६. सदर प्रकल्प राबविण्यासंदर्भात महाराष्ट्र शासनाची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील .

i. सदर प्रकल्पासाठी जमिनीचे अधिग्रहण करण्यासाठी, पर्यावरण विषयक परवानग्या, वन जमिनीचे प्रकल्प, जमिनीसाठी रुपांतरण, वने विषयक परवानग्या मिळविणे यासाठी राज्य शासनाने विशेष उपयोजिता वाहनास (SPV) आवश्यक सहाय्य करणे.

ii. सदर प्रकल्पासाठी राज्यामध्ये पाणी, वीज, मार्गाचे हक्क (Right Of Way) यांना मान्यता देणे.

iii. सदर प्रकल्पाची व्यवहार्यता वाढविण्यासाठी मालेगाव जि. नाशिक तसेच अन्य ठिकाणी Multi Modal Logistics Park उभारण्यासाठी जमिन अधिग्रहण करून देणे.

७. सदर प्रकल्पाची विशेष उपयोजिता वाहन (SPV) स्थापन करण्यासाठी Memorandum of Understanding करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महसूल व वन विभाग, नियोजन विभाग आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. विवि/शिकाना/२६१, दि. १४/७/२०१८ अन्वये व त्यांच्या सहमतीनंतर मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१३१२१५४१७०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarangkumar Vasantrao Patil

Digitally signed by Sarangkumar Vasantrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ff4eb5e12b895076f38d0375877408323ed82b780f45ba77108c21a289d50d4b, serialNumber=47644ba707f1cc419e5362269a74b7b1ec6ab4f745648def2597546d88711bb4, cn=Sarangkumar Vasantrao Patil
Date: 2018.08.13 16:24:37 +05'30'

**(सारंगकुमार पाटील)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सर्व मा. राज्यमंत्री/ मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७. मा. उपसभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्षनेता यांचे खाजगी सचिव (विधानसभा), विधानभवन, मुंबई
९. मा. विरोधी पक्षनेता यांचे खाजगी सचिव (विधानपरिषद), विधानभवन, मुंबई
१०. मा. संसद सदस्य (महाराष्ट्र राज्य)
११. सर्व मा. विधानसभा सदस्य
१२. सर्व मा. विधानपरिषद सदस्य
१३. मा .मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व अपर मुख्य सचिव प्रधान/सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१५. अध्यक्ष, रेल्वे मंडळ, भारतीय रेल्वे भारत सरकार ( द्वारा व्यवस्थापकीय संचालक मुख्य मध्य रेल्वे यांच्या मार्फत)
१६. अध्यक्ष, जवाहरलाल नेहरु बंदरे विश्वस्त, नवी मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक, भारतीय बंदरे रेल्वे महामंडळ लि. मुंबई
१८. सर्व विभागीय आयुक्त
१९. सर्व जिल्हाधिकारी.
२०. वित्त विभाग (व्यय- ८ ) मंत्रालय, मुंबई
२१. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२२. महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२३. निवड नस्ती (परिवहन ५)